**मे.महाराष्ट्र व्हॅली व्ह्यू प्रा.लि. मुंबई यांच्या खाजगी धरण स्वखर्चाने बांधण्याच्या व बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या (Bulk water entitlement) प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक.बिसिंआ २०१४/(३५२/१४)/सिं.व्य.(धो)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १६/०२/२०१९

**संदर्भ**:- १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र दि.२७/८/२०१८
२) जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण १००१/(१५४/०१)सिंव्य (धो),दि.२१/१/२००३
३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४
४) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि. १७/११/२०१६
५) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ नुसार मे.महाराष्ट्र व्हॅली व्ह्यू प्रा. लि. मुंबई यांच्या मुळशी परिसरातील गिरीस्थान विकास प्रकल्पासाठी नियोजित ठिकाणी कुंडलिका नदीखोऱ्यात धरण स्वखर्चाने बांधण्याकरीता घरगुती पाणी आरक्षणासाठी प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्थर निश्चित करण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र सिंचन कायदा १९७६ भाग - ३ कलम ११ (३ ) मधील तरतूदीनुसार नैसर्गिक स्त्रोतावर धरण बांधणे, पाणी आडवणे याबाबत शासनाची मंजूरी आवश्यक आहे. मजनिप्रा अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार प्राधिकरणाने या प्रकल्पास त्यांचे आदेश क्र. ७/२०१८ दि.७/६/२०१८ अन्वये सहमती दिली आहे. कोकण एकात्मीक जलआराखडयात या प्रकल्पाचा समावेश अ. क्र.४० वा करण्यात आलेला आहे. उपरोक्त बाबीचा विचार करुन मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या मान्यतेने खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय :-**

मे.महाराष्ट्र व्हॅली व्ह्यू प्रा.लि. मुंबई यांच्या पाणी आरक्षणास Bulk water entitlement व त्याकरीता खासगी धरण स्वखर्चाने बांधण्याच्या प्रस्तावास खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार व परिच्छेद ३ मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/कालव/ नदीचे नांव | पाणी आरक्षण (दलघमी) Bulk water entitlement |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | मे.महाराष्ट्र व्हॅली व्ह्यू प्रा.लि. मुंबई | गिरीस्थान विकास प्रकल्प/ घरगुती वापर | एम.व्ही.व्ही.पी.एल.सरोवर भांबर्डे ता.मुळशी, जि.पुणे कुंडलिका नदी खोरे | ३.०० दलघमी |

३. उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १००१/ (७१३/२००१)/ सिंव्य(धो), मुंबई- ३२, दि.७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

२. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण आदेश क्र १/२०१८ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

४. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.

५. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

६. पाणी उचलण्याची /पुरवठयाची जागा व क्षेत्रिय परिस्थितीनूसार इतर अटी शर्तींचा अंतर्भाव करून संबंधीत मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

७. सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र जलसेपत्ती नियमन प्राधिकरणचे प्रचलित पाणी वापराचा मापदंड लागू राहील व उपरोक्त मापदंडा व्यतिरिक्त पाणी शिल्लक असल्यास हे नैसर्गिक स्त्रोत असल्यामुळे धरण परिसरातील लोकवस्तीस मागणी असल्यास उपलब्ध करून देणे आवश्यक राहिल.

८. ॲम्बी व्हॅली व लवासा विशेष नागरी वसाहती जिल्हा पुणे यांचेसाठीच्या अटी व शर्तीच्या धर्तीवर अनुषंगीक क्षेत्रीय बाबी विचारात घेवून शासन हिताच्या दृष्टीने आवश्यक अटी व शर्ती कोकण पाटबंधारे विकास महामंडळाने निश्चित करुन त्याचा अंतर्भाव मंजूरीच्या पत्रात व करारनाम्यामध्ये समाविष्ट कराव्यात

९. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण व शासन ठरवेल ते पाणीपट्टी दर, वेळोवेळी होणारे सर्व बाबतीतील नियम, अटी , शर्ती, शासन निर्णय, कायदयातील तरतूदी लागू असतील .

१०. धरणासाठीच्या जमीन संपादन, पुनवसनाची संपूर्ण आर्थिक, भौतिक जवाबदारी संस्थेची असेल.

११. धरण सुरक्षितता व पूरनियंत्रण याची पूर्ण जबाबदारी संस्थेची राहिल . त्यांना जलसंपदा विभागाचे निर्देशाचे तंतोतंत पालन करावे लागते. लागेल

१२. धरणांचे संकल्पन मध्यवर्ती कल्पचित्र संघटनेकडून प्रमाणीत करुन घ्यावे लागेल तसेच बांधकामाचे गुणवत्तेसाठी गुणनियंत्रण मंडळाशी निरपक्षीय करार सशुल्क, सेवा तत्वावर करावा लागेल.

१३. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या आदेश क्र. ७/२०१८ दिनांक ७.६.२०१८ मधील खालील आदेशान्वये कार्यवाही करावी.

The clearance shall be effective from the date of approval of ISWP with inclusion of this project with necessary water utilization by the State Water Council and shall be governed by all other conditions as made applicable by the concerned RBA.

१४. धरणाची साठवण क्षमता मंजूर ३ दलघमी पेक्षा जास्त असू नये.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१६१६२६०१९९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2019.02.16 16:30:48 +05'30'

**(अ.अ.कपोले)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१०. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे.
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१४. मुख्य अभियंता (पा)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मुख्य अभियंता , जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
१७. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांना माहितीस्तव
१८. अधीक्षक अभियंता , ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
१९. निवड नस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)